**प्रधानमंत्री आयुष्यमान भारत आरोग्य पायाभूत अभियान PM-ABHIM" या योजनेअंतर्गत SNA PARSH करिता अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून निधी वितरीत करणेबाबत.**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२१०एच५०७)**
**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२१०एच५१६)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २० मार्च, २०२५

**वाचा :-** १) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४
२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र. **PHD-30011/53/2025-PHD (Arogya 7, NRHM)**
३) शासन ज्ञापन समक्रमांक दि. २०.०३.२०२५

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आयुष्यमान भारत आरोग्य पायाभूत अभियान योजनेसाठी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२१०एच५०७ (केंद्र हिस्सा) मध्ये ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या उद्दिष्टामध्ये रु.०.०१ लाख तसेच लेखाशिर्ष २२१०एच५१६ (राज्य हिस्सा) मध्ये ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या उद्दिष्टामध्ये रु.०.०१ लाख इतका निधी अर्थसंकल्पी आहे. तसेच संदर्भाधीन दि.२०.३.२०२५ च्या ज्ञापनान्वये लेखाशिर्ष २२१०एच५०७ (केंद्र हिस्सा) मध्ये ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान मध्ये रु.३६८.२४ लाख तसेच लेखाशिर्ष २२१०एच५१६ (राज्य हिस्सा) मध्ये ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान या उद्दिष्टामध्ये रु.२४५.४९ लाख इतका निधी पुनर्वितरणाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४, दि.२५.७.२०२४, दि.१२.२.२०२५ व दि.१७.३.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार "PM-ABHIM" या योजनेअंतर्गत केंद्र शासनाने SNA PARSH द्वारे मंजूरी आदेशानुसार PM-ABHIM कार्यक्रमांचे देयके अदा करण्यासाठी लेखाशिर्ष २२१०एच५०७ (केंद्र हिस्सा) मध्ये "३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान" या उद्दिष्टामध्ये रु.३६८.२४ लाख तसेच लेखाशिर्ष २२१०एच५१६ (राज्य हिस्सा) मध्ये "३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान" या उद्दिष्टामध्ये रु.२४५.४९ लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. सदर निधी PFMS प्रणालीमार्फत SNA खात्यामध्ये जमा करण्यात यावा व याची खातजमा विभागाने करावी. PFMS प्रणालीद्वारे राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या अनुषंगाने केंद्र शासनाने वेळोवेळी जारी केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४, १२.२.२०२५ व दि.१७.३.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०१.०४.२०२४, दि.२५.०७.२०२४, १२.२.२०२५ व दि.१७.३.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाने ऑनलाईन नस्तीवर दिलेलया सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२०१६४५१५२७२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

DIPALI M SHAHARE

Digitally signed by DIPALI M SHAHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=d04eb42b12fb47e33c7eeb7688422942f312490bb2c05f193239c86b90923ebc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5B8DDD9A6616B549721333288CDD011356BBC07CC98BAD29D1250DD98073BDB3, cn=DIPALI M SHAHARE
Date: 2025.03.20 16:46:03 +05'30'

**( दिपाली शाहारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व जिल्हाधिकारी
४) महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग